# शहर जे चालत गेले

मैरी जेन फिनसांडो, चित्र: रेग सैंडलैंड

मराठी: अश्विनी बर्वे



# शहर जे चालत गेले

मैरी जेन फिनसांडो, चित्र: रेग सैंडलैंड

मराठी: अश्विनी



## लेखकाची नोट

या कहाणीमधल्या काही गोष्टी त्या काळात प्रसिद्ध झालेल्या वर्तमानपत्रातून घेतल्या आहेत. यातील काही हिबिंग हिस्टोरिकल म्युझियम, हिबिंग लायब्ररी आणि मिनेसोटा हिही कहाणी आहे हिबिंग नावाचे एक शहराची, जे मिनेसोटाच्या मेसाबी लोहा अयस्क रेंजच्या मध्ये स्थित आहे. सुरुवातीपासूनच हिबिंग त्या लोह अयस्कवर निर्भर होते, जे त्याच्या अस्तित्वासाठी जरुरी होते. म्हणून जेव्हा शहराच्या खाली लोह अयस्कचा शोध घेतला गेला, तेव्हा निर्णय घेतला गेला: शहर स्थलांतरित करावे लागेल. पण आपण पूर्ण शहर कसे हलवणार? आजही हे काम मुश्किल होईल, पण १९०० च्या सुरुवातीला तर हे काम जवळजवळ अशक्य वाटत होते. पण हिबिंगच्या लोकांनी आपले शहर वाचवण्याचे ठरवले. हे पुस्तक सांगते की त्यांनी अशक्य ते कसे शक्य केले.

स्टोरिकल म्युझियम रेकॉर्ड मधून पण घेतले आहे. आणि कहाणीचा मोठा भाग मला हिबिंगमध्ये राहणाऱ्या लोकांनी सांगितला.



एका काळाची गोष्ट आहे, जेव्हा संयुक्त राज्य अमेरिका अजून एक युवा राष्ट्र होते.

तेव्हा देशाचा अधिकांश भाग जंगलाने व्यापला होता.

आणि म्हणून उत्तरी मिनेसोटाचे सुद्धा तशीच परिस्थिती होती.

तिथे काय होते? जंगल आणि तलाव.

अस्वल, हरिण आणि लांडगे.

काही लोकांना वाटलं ई तिथे सोने-चांदी मिळू शकेल.

ते निश्चित नव्हते, पण ते उत्सुक होते.

म्हणून ते दाट जंगलात आपलं नशीब आजमावण्यासाठी गेले.



त्यातले काही लोक जनावरांची शिकार करायला गेले.

मग त्यांनी दूरच्या शहरांमध्ये लोकांना जनावरांची कातडी विकली.

काही लोक झाडं कापायला आणि लाकडं विकायला आले होते.

काही इतर लोक तिथे चांदी किंवा सोन्याच्या शोधात आले होते.

पण त्यांना उत्तर मिनेसोटामध्ये त्या गोष्टी मिळाल्या नाही.

आणि तिथं त्याचं जीवन सोप्पं नसे.

तिथं शहरे नव्हती,

रस्ते नव्हते.

हिवाळा जास्त काळ चालणारा आणि अधिक थंडीचा असे.

ती जागा परिवाराला घेऊन येण्यासारखी नव्हती. म्हणून तिथे फक्त पुरुषच जात.



मग, १८९१च्या ऑगस्टमध्ये, जंगलात चक्रवादळ आले.



खूप जोरात हवा वाहत होती.

त्यामुळे मोठ-मोठी झाडं उखडली गेली..

उखडलेल्या झाडांच्या मुळाच्या खाली लोकांना लोह खनिज दिसले.

उत्तर मिनेसोटामध्ये सोने-चांदी भले मिळाले नसले, तरी १८०० शतकात लोह खनिजाचा शोध तितकाच रोमांचक होता.

लोह खनिज दगडात असते, ज्यातून आपल्याला लोह मिळते. आणि १८०० च्या दशकात रेल्वेगाड्या आणि रेल्वेचे रूळ निर्माण करण्यासाठी स्टीलची खूप गरज असे.

लवकरच मिनेसोटा मध्ये लोह खनिजाचा शोध लागला याची बातमी पूर्ण देशभर पसरली.

त्यानंतर मिनेसोटामध्ये येणाऱ्या लोकांची गर्दी झाली.

काही लोक लोह खनिज खोदून काढण्यासाठी आले.

त्या लोकांमध्ये एक नाव फ्रँक हिबिंग होते.

फ्रँक हिबिंगला माहीत होते की जर त्याने लोह खनिजाची खाण सुरु केली तर त्याला काम करण्यासाठी माणसांची गरज पडेल.

आणि जे लोक काम करण्यासाठी तिथे येतील ते आपल्या कुटुंबाला बरोबर घेऊन येतील.

म्हणून, हिबिंगने एक नवीन शहर तयार करण्याचा निर्णय घेतला.

सगळ्यात आधी त्याने जमीन खरेदी केली.

मग त्याने रस्ते तयार करण्यासाठी लोकांना कामावर ठेवले.

त्याने कुटुंबासाठी घरं तयार करण्यासाठी लोकांना कामावर ठेवले.



लवकरच पूर्ण देशातले लोक हिबिंगच्या खाणीत काम करण्यासाठी आणि त्याच्या शहरात राहण्यासाठी येऊ लागले.

ते लोक आयर्लंड, स्वीडन आणि जर्मनीसारख्या दूर देशांतून पण आले.

काही लोक खाणीत काम करण्यासाठी आले, पण काही लोक दुकाने उघडण्यासाठी आले.

लवकरच तिथे शाळा, चर्च आणि बँकपण उघडली गेली.

१५ ऑगस्ट १८९३ला लोकांनी हिबिंग, मिनेसोटाला, एक शहर बांधण्यासाठी आपले मतदान केले.



हिबिंग आपल्या लोह खनिजासाठी प्रसिद्ध झाले.

शहर वाढत गेले आणि वाढत गेले.

तिथे राहणाऱ्या सगळ्या लोकांनी आपल्या हिबिंग शहराचा अभिमान वाटत असे.

ते एक सुंदर शहर बांधू इच्छित होते.

त्यांनी फॅन्सी थिएटर, सुंदर पार्क आणि मस्त घरं बांधली.

त्यांनी आपल्या मुलांसाठी उत्कृष्ट शाळा सुरु केल्या, आणि त्यांनी आपल्या शहराची चांगली देखभाल केली.

मग एक दिवस खाणीच्या मालकांनी अजून एक शोध लावला.

सगळ्यात चांगले लोह खनिज ठीक त्यांच्या हिबिंग शहराच्या बिलकुल खाली होते.

आता हिबिंगच्या लोकांना शहर सोडून जावं लागणार होते.

असं केलं नाही तर खाणी बंद कराव्या लागतील.

आणि मग खाण कामगार बेरोजगार होतील.

त्याबरोबर इतर व्यवसायही बंद होतील..



या बातमीमुळे हिबिंगच्या लोकांना खूप अस्वस्थ केले.

त्यांनी आपल्या सुंदर शहराच्या निर्मितीसाठी खूप मेहनत केली होती.

त्यांना ते कसं सोडू वाटेल?वे

नवीन खाणीसाठी रस्ता तयार करण्यासाठी ते आपले आवडते शहर तुटतांना कसं बघू शकणार होते?







“आम्ही कुठं जायचं?” लोकांनी विचारलं.

“आम्ही तुम्हा लोकांसाठी एक नवीन शहर बांधू.”खाणी मालक म्हणाले.

“पण आम्ही आमची चांगली घरं, फॅन्सी थिएटर आणि आमच्या सुंदर हॉटेलांचे काय होईल?” लोकांनी विचारले.

खाण मालकांनी विचार केला अजून विचार केला, आणि शेवटी एक उत्तर मिळाले.

“आम्ही तुमची घरं स्थानांतरीत करू.” ते म्हणाले.

“आपण पूर्ण शहर शिफ्ट करू!”

लोकांना हा विचार अद्भुत वाटला.

ते पूर्ण शहर शिफ्ट कसे करणार?



खाणीच्या मालकांनी आणि लोकांनी एकत्र बसून चर्चा केली.

“आपल्याजवळ घोडे आणि ट्रॅक्टर आहे," एक माणूस म्हणाला.

“त्याने कदाचित आपण इमारती ओढू शकतो.”

“पण आपण जमिनीवरच्या मोठ्या इमारती ओढू शकणार नाही,” मेयर म्हणाले.

“तेव्हा इमारतीचे तुकडे-तुकडे होतील. आपल्याला चाकं आणि अजून काही इतर गोष्टी पाहिजे.”

“चाकं, एक समस्या आहे,“ खाण मालक म्हणाले.

“आपले अधिकांश चाकं इतके मोठे किंवा इतके मजबूत नाहीत की ते एखाद्या इमारतील हलवू शकतील.”



"ठीक आहे," कोणीतरी म्हटले, "आपल्याजवळ खूप अशी झाडं आहेत. आपण त्यांना कापू शकतो, मग त्यांच्या फांद्या गुळगुळीत करून त्यांच्यावर आपली घरं ओढत आणू शकतो."

"खूप छान उत्तर आहे!" प्रत्येकजण आनंदाने ओरडले.





त्यांनी झाडं कापली.

त्यांनी झाडांच्या फांद्या कापल्या.

त्यानंतर त्यांना गुळगुळीत केले.



त्यानंतर खाण मालकांनी आणि लोकांनी शिफ्टिंगची तयारी सुरु केली.

त्यांनी इमारती त्यांच्या तळघरापासून वेगळ्या केल्या.

मग त्यांनी सगळ्या इमारतींसाठी नवीन तळघरे खोदली.

जगभरातील लोकांनी हिबिंगच्या स्थानांतरित होण्याच्या योजनेबद्दल ऐकलं.

"असंभव!" सगळे लोक म्हणाले.

शहरातल्या मोठ्या वर्तमानपत्राने लिहले:

"हिबिंगचे लोक वेडे झाले आहेत!"

कोणाचाही विश्वास बसला नाही की हिबिंगचे लोक पूर्ण शहर स्थानांतरीत करू शकतील.



शेवटी घरं शिफ्ट करण्याचा दिवस आला.

हिबिंग हॉटल, शिफ्ट होणारी पहिली इमारत असणार होती..

खाण कामगारांनी खाणीच्या क्रेनला मोठ-मोठ्या साखळ्या आणि दोऱ्या बांधल्या.

क्रेन वाफेवरच्या इंजिनावर चालवले.

मग साखळ्यां, हिबिंग हॉटेलच्या वर-खाली बांधल्या.

हळूहळू क्रेनने हॉटेलला हवेत थोडं वर उचललं.

मग त्यांनी हॉटेल फिरवून त्याला त्या झाडांच्या ओंडक्यावर हळूच ठेवले.







त्यानंतर दोरे आणि साखळ्या हॉटेलच्या चारी बाजूला लावल्या आणि मग त्यांना समोरच्या घोड्यांना बांधले.

“चला! पुढे व्हा!" घोड्यांचे चालक

घोड़े पुढे चालू लागले. हळूहळू हिबिंग हॉटेल गल्लीतून जाऊ लागले.

इमारतीच्या खालून मागचा ओंडका निघाला की लोक लगेच तो उचलत..



मग तो उचलून घोड्यावरून इमारतीच्या पुढच्या भागाकडे ओढत नेत.

मग ते ओंडके परत इमारतीच्या खाली सरकवत.



हिबिंग हॉटल शिफ्ट केल्यानंतर, त्यांनी ओलिवर क्लब-हाउस शिफ्ट केले.

ओलिवर इतका मोठे होते की ते हलवण्यासाठी त्याला दोन भागात कापावे लागले.

रस्त्यावरील इमारती आपल्या नवीन जागेवर लोटत नेल्या.

रोज हिबिंगच्या लोकांनी आपले सुंदर शहर वाचवण्यासाठी काम केले.

शेवटी सगळ्या व्यावसायिक इमारती स्थानांतरित केल्या गेल्या.

त्यानंतर रहिवासी घरांची वेळ आली.



“आम्ही आमच्या फर्निचरचे काय करावे?” महिलांनी विचारले.

“आणि आम्ही आमच्या खेळण्याचे आणि कपड्यांचे काय करावे?” मुलांनी विचारले.

“तुम्ही सगळ्या वस्तू घरातच राहू दया.” त्यांनी सांगितलं. “आणि जर तुम्हांला वाटलं तर तुम्ही सुद्धा घरात राहू शकतात.”









पुढच्याच दिवशी आधी घरांना ओंडक्यावर उचलून ठेवले.

घर हळूहळू गल्लीतून खाली ओढत आणले गेले.

समोर झाडाचा एक ओंडका ठेवला गेला. मग त्यावर घर ठेवले. मग घराच्या मागचा ओंडका बाहेर काढला. तो परत समोर ठेवला आणि मग मागचा ओंडका काढला आणि त्यावर घर ठेवले..

आणि हे चालूच राहिले आणि शेवटी सगळी १८६ घरे एका नंतर एक करून शिफ्ट केली.



हिबिंगच्या लोकांनी सफलतापूर्वक आपले शहर शिफ्ट  केले.

त्यांना आपल्या कामाचा गर्व होता.



## अंतिम शब्द

हिबिंगचे  शिफ्टिंगचे काम वर्ष १९१२ मध्ये सुरु झाले, पण अधिकांश इमारती १९२०च्या दशकात शिफ्ट केल्या गेल्या. १९५३च्या पानगळी मध्ये शेवटची इमारत शिफ्ट केली गेली..

हिबिंगच्या लोकांना आपले शहर यासाठी शिफ्ट केले की त्यांचे आपल्या शहरावर प्रेम होते.कितीतरी वर्षे त्यांना हे माहीत नव्हते की त्यांनी एक इतिहास रचला आहे.जर आज आपण हिबिंगला गेलो तर आपण त्या इमारती पाहू शकतो ज्या ओंडक्यावर वाहून आणल्या आहेत. आणि आजही उभ्या आहेत. आणि अजूनही लोकांना हे सांगतांना गर्व वाटतो, “आम्ही हिबिंगचे आहोत. ते शहर ज्याला शिफ्ट केले गेले होते.”



